**मौजे वेळणेश्वर, बौध्दवाडी, ता. गुहागर, जि. रत्नागिरी येथे संरक्षक भिंत बांधण्याकरीता निधी मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन,आ.व्य.प्र.)**
**शासन निर्णय क्रमांक: आव्यप्र २०२१/प्र.क्र.५६/आव्यप्र-२,**
मंत्रालय, मुंबई-४०००३२,
दिनांक : १४ मार्च, २०२२.

**संदर्भ :** विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. :- मशा/ कार्या-६/ नै.आ./वेळणेश्वर-संरक्षक भिंत/कावि-३९६६७/२०२१, दि.२७.१२.२०२१.

**प्रस्तावना :**

मौजे वेळणेश्वर,बौध्दवाडी, ता. गुहागर, जि. रत्नागिरी येथे डोंगराळ भाग असून त्याठिकाणी पावसाळ्यात भूस्खलन होत असल्याने ग्रामस्थांच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने मौजे वेळणेश्वर, बौध्दवाडी या ठिकाणी संरक्षक भिंत बांधण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांनी प्रस्तावित केल्यानुसार विभागीय आयुक्त, कोकण यांनी मौजे वेळणेश्वर, बौध्दवाडी, ता. गुहागर, जि. रत्नागिरी येथे डोंगराळ भाग असून त्याठिकाणी पावसाळ्यात भूस्खलन होत असल्याने ग्रामस्थांच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने मौजे वेळणेश्वर, बौध्दवाडी येथे संरक्षक भिंत बांधण्याकरीता प्रशासकीय मान्यता व सदर कामासाठी रु. १,६२,२५,६६४/- (रुपये एक कोटी बासष्ट लाख पंचवीस हजार सहाशे चौसष्ट फक्त) निधी मंजूरीसाठी प्रस्ताव शासनास सादर केला आहे. विभागीय आयुक्त, कोकण यांनी प्रस्तावित केल्यानुसार मौजे वेळणेश्वर, बौध्दवाडी येथे संरक्षक भिंत बांधण्यासाठीच्या अंदाजपत्रकास या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदर कामासाठी रु. १,६२,२५,६६४/- (रुपये एक कोटी बासष्ट लाख पंचवीस हजार सहाशे चौसष्ट फक्त) इतका निधी शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात येत आहे.

२. वरील कामासाठी जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. उपरोक्त नमूद संरक्षक भिंतीच्या कामाकरीता होणारा खर्च हा **"२२४५- नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च (९१) (०६) नैसर्गिक आपत्तीमुळे अनुज्ञेय विभागातील आपत्तीग्रस्त पायाभूत सुविधांचा तातडीच्या स्वरुपाच्या दुरुस्ती/पुर्नस्थापनेसाठी खर्च (अनिवार्य) लेखाशिर्ष २२४५ २४६१"** या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. हा निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर होत आहे याची जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांनी खातरजमा करावी. ज्या प्रयोजनासाठी निधी वितरीत करण्यात आला आहे त्याबाबतची माहिती जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांनी या विभागाकडे मासिक खर्चाचा अहवालासोबत सादर करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेखे/ नोंदवहया विहित कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरित व वितरीत करणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर अद्यावत ठेवण्यात याव्यात. त्याचप्रमाणे होणाऱ्या प्रत्यक्ष खर्चाचे पत्र पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यंत जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांनी एकत्रितपणे महसुल व वन विभागास ( कार्यासन म-११) न चुकता

सादर करावे. झालेल्या खर्चाची महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीच्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घ्यावी व हा खर्च तात्काळ करण्यात यावा. वितरीत करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहित वेळेत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

**५.** नियंत्रक अधिकाऱ्यांनी अनुदान वाटपाची एक प्रत सचिव ( मदत व पुनर्वसन ) यांना न चुकता सादर करावी. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कोषागार / उपकोषागार यांच्याकडे पाठविण्यात येणाऱ्या बिलांसोबत जोडल्या जाणाऱ्या संगणक चिठ्ठीमध्ये गौण / उपशिर्षाच्या "संगणक यंत्र" संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा, असे आदेश कृपया संबंधित अधिकाऱ्यांना नियंत्रण अधिकाऱ्यांनी द्यावेत. तसेच कोषागारातून / उपकोषागारातून आहरित केलेल्या रकमेचा अहवाल शासनास सादर करावा.

**६.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. ४४/२०२२/व्यय-९, दिनांक ०८.०२.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३१४१६०१३७१११९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANDEEP NAMDEO KAMBLE

Digitally signed by SANDEEP NAMDEO KAMBLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b397fcb3ef8423557755d7d4cf38232e23ade4cc99bcaf818e1f49cebd842804, pseudonym=E14A6C7BDC7544D127BE94A39CB259A8518EA959, serialNumber=BA1E056AD55B2F343783A4C13760C8EEF1236DF77EBD34A5CC6127A29F1650B1, cn=SANDEEP NAMDEO KAMBLE
Date: 2022.03.14 16:04:03 +05'30'

**( संदीप ना. कांबळे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.
२. जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, रत्नागिरी.
३. कोषागार अधिकारी, रत्नागिरी.
४. महालेखापाल १/२ ( लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षण) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपुर (प्रत्येकी ३ प्रती)
५. अवर सचिव/कार्यासन अधिकारी, (ब-१/म-११/पीएसी/पीएसी-१ कार्यासने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. निवड नस्ती, आव्यप्र-२.